प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक येथील इमारतीच्या नुतनीकरण/दुरुस्ती खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०५२३/प्र.क्र.१६३/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबां (१५)/०६२१/न.क्र.०१/का.१०(१)/ २०२१/जा. क्र. ५१३०/ दि.२८.०४.२०२३.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक इमारतीचे बांधकाम हे साधारणत: ४० वर्षापूर्वी झालेले आहे. तसेच सदर इमारतीचे छत हे पावसाळ्यामध्ये गळती होत असल्याने इमारतीच्या छताचे व इतर बाबींचे नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक इमारतीचे छत हे पावसाळ्यामध्ये गळती होत असल्याने इमारतीच्या छताचे नुतनीकरण करणे, अधिकारी कक्षाचे नुतनीकरण करणे, कर्मचारी कक्षाचे नुतनीकरण करणे, इमारतीमध्ये शौचालयाचे नुतनीकरण करणे, पाणी पुरवठा, मलनिस्सारण व्यवस्थाचे नुतनीकरण करणे, विद्युतीकरणाचे नुतनीकरण करुन अद्ययावत सौर उर्जा युनिट बसविणे यासाठीच्या एकूण रु.२,२८,६३,४५७/- (अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठावीस लाख त्रेसष्ठ हजार चारशे सत्तावन्न फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरील अंदाजपत्रकांचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| **अ.क्र.** | **कामाचा तपशिल** | **रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १. | इमारतीचे नुतनीकरण (स्थापत्य) | १,७३,१३,६८३.०० |
| २. | इमारतीचे विद्युतीकरण | १९,०४,५०५.०० |
| | **एकूण** | **१,९२,१८,१८८.००** |
| ३. | Royalty | ४४,०८७.०० |
| ४. | GST १८% on (P) | ३४,५९,२७३.८४ |
| ५. | Add Labour Insurance ०.५% on (P) | ८६,५६८.०० |
| ६. | Lab Test | ५५,३४०.०० |
| | एकूण | **२,२८,६३,४५७.००** |

(अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठावीस लाख त्रेसष्ठ हजार चारशे सत्तावन्न फक्त)

३. सदर प्रशासकीय मान्यता खालील बाबींची पूर्तता करण्याच्या अटीस अधीन राहून देण्यात येत आहे:-

i. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

ii. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही - २०१३ /प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

iii. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च गृह (परिवहन) विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात येईल.

iv. सदर कामाची ई-निविदा करताना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

v. सदरहू प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने आवश्यक निधीची तरतूद स्वतंत्रपणे करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारमधील परिच्छेद क्र.१३४(१),१३४(२) आणि १३४(३) मधील वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटीमध्ये सुधारणा करण्याबाबतचा वित्त विभाग, शासन निर्णय दि.२०.०९.२०१९ मधील अ.क्र.१,परिच्छेद क्र. १३४(२) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२१११५०४६४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2024.08.21 12:05:52 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर.
४. अपर मुख्य सचिव,गृह (परिवहन) विभाग,मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषाधिकारी, जिल्हा नाशिक.
९. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (परि-४).